गृह विभाग-मागणी क्र. बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, ००, ८००, इतर खर्च, (००) (००)(०५) *महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे* (कार्यक्रम) (४०७० ०१५१), ५३-मोठी बांधकामे," याखाली पुरवणी अनुदान म्हणून मंजूर झालेल्या निधीपैकी ७० टक्के निधी वितरित करणे व खर्च करणे यांकरिता मंजुरी देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग
## शासन निर्णय क्र. पूरक-१०१८/प्र.क्र.३९९/पोल-७.

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २४ जानेवारी २०१९.

**वाचा** :-
1. १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८.
2. २) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक पूरक-२०१८/प्र.क्र.१३५/अर्थ-३, दिनांक ०५.१२.२०१८.

**शासन निर्णय.**

महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०१८ च्या तिसऱ्या (हिवाळी) अधिवेशनात, "गृह विभाग-मागणी क्र. बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, ००, ८००, इतर खर्च, (००) (००)(०५) *महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे* (कार्यक्रम) (४०७००१५१), ५३-मोठी बांधकामे," याखाली रु.७५ कोटी इतका निधी पुरवणी अनुदान म्हणून मंजूर झाला आहे. त्यापैकी ७० टक्के निधी अर्थात रु.५२,५०,००,०००/- *(रुपये बावन्न कोटी पन्नास लक्ष फक्त)* वितरित व खर्च करणे यांसाठी, याद्वारे, मंजुरी देण्यात येत आहे.

२. उक्त रक्कम ही अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई, येथून काढून ती व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई, यांना देण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. "*महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे*" ही नवीन योजना नाही. तसेच, या योजनेचे स्वरुप व व्याप्ती यांमध्ये बदल झालेला नाही.

**४.** गृह विभाग-मागणी क्र. बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, ००, ८००, इतर खर्च, (००) (००)(०५) *महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे* (कार्यक्रम) (४०७००१५१), या लेखाशीर्षाखाली, ५३-मोठी बांधकामे या उद्दिष्टाकरिता प्रत्येक वित्तीय वर्षात निधी उपलब्ध करुन देण्यात येत असतो. या लेखाशीर्षाखाली करण्यात आलेल्या खर्चाचे एक वर्षाहून अधिक कालावधीचे संक्षिप्त बिल *(Abstract Bill)* प्रलंबित नाही. तसेच, *" महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे"* या प्रयोजनासाठी निधी काढण्यासाठी संक्षिप्त बिल सादर करण्यात येत नाही.

**५.** तसेच, याद्वारे असे प्रमाणित करण्यात येते की,-

I. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग पाच, मधील अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४, अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन, दिनांक १०.०६.२०१८ पर्यंत रु.५ कोटी पेक्षा जास्त किंवा, यथास्थिती, दिनांक ११.०६.२०१८ पासून रु.१५ कोटी पेक्षा जास्त रकमांचे खर्चाचे अंदाज असलेल्या नवीन बांधकाम प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यापूर्वी शासनाच्या सचिव समितीची मान्यता घेण्यात आली आहे.

II. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८, याच्या परिशिष्टातील अ.क्र.८ मधील तपासणी सूचीतील प्रत्येक अटीची पूर्ती झाली आहे.

**६.** हा शासन निर्णय, अनौपचारिक संदर्भ क्र.२६०/१४६१, दिनांक २८.१२.२०१८, आणि अनौपचारिक संदर्भ क्र.११/२०१९/व्यय-७, दिनांक १०.०१.२०१९, यांच्या अन्वये मिळालेल्या अनुक्रमे नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१२४१६०९४०३०२९ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.01.24 16:18:07 +05'30'

(स्वप्नील गोपाल बोरसे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.

४) मा. राज्यमंत्री, गृह (शहरे), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई.

प्रत-

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
६) कार्यासन अधिकारी (अर्थसं-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवड फाईल, पोल-७.